**सह संचालक, नगर रचना (गट-अ/राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांना संचालक, नगर रचना (गट-अ/राजपत्रित) पदावर तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन आदेश क्रमांक : बिंदुना-५६२१/प्र.क्र.२१२/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३० नोव्हेंबर, २०२१.

वाचा :- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२.०९.२०१६.
२) सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्रमांक : ईएसबी-११२१/प्र.क्र.२२८/१३, दि.१२.११.२०२१.

**प्रस्तावना :-**

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील संचालक, नगर रचना (गट-अ /राजपत्रित) (वेतनश्रेणी : एस-२९ : रु.१,३१,१००-२,१६,६००) या संवर्गातील रिक्त पद निम्न संवर्गातील सह संचालक, नगर रचना (गट-अ/राजपत्रित) (वेतनश्रेणी : एस-२७ : रु.१,१८,५००-२,१४,१००) या संवर्गातून तात्पुरत्या पदोन्नतीने भरण्यासाठी आस्थापना मंडळ क्र.२ ची बैठक दि.१२.११.२०२१ रोजी घेण्यात आली होती. त्यानुसार आस्थापना मंडळाने सन २०२१-२०२२ वर्षाच्या निवडसूचीकरीता सेवाज्येष्ठतेनुसार तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यासाठी पात्र असलेल्या अधिकाऱ्याच्या नावाची शिफारस केली आहे. सदर अधिकाऱ्यास पदोन्नती व पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने आता पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहे.

**शासन आदेश :-**

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आलेल्या सह संचालक, नगर रचना (गट-अ/राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांना **संचालक, नगर रचना (गट-अ/राजपत्रित) (एस-२९ : रु.१,३१,१००-२,१६,६००)** या पदावर खालील अटींच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून खालीलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | ज्येष्ठता क्रमांक (२०२१ प्रारुप) | अधिकाऱ्याचे नांव | जात प्रवर्ग | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | श्रीमती प्रतिभा उमेश भदाणे | इ.मा.व. | संचालक, नगर रचना तथा मुख्य नियोजक, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई. |

**अटी व शर्ती :-**

I. मा.सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील निर्णयास अधीन राहून सदर निव्वळ तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे.

II. रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७८/२०२१ मध्ये मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि.२५.०५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.

III. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

IV. या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांविरुद्ध सद्य:स्थितीत कोणतीही विभागीय चौकशी / न्यायालयीन कारवाई प्रलंबित अथवा प्रस्तावित नाही, या अटीच्या अधिनतेने सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

V. जात पडताळणी कार्यालय यांच्याकडून प्राप्त जात पडताळणी प्रमाणपत्रासंबंधी भविष्यात कोणत्याही स्तरावर तफावत आढळून आल्यास संबंधित मागासवर्गीय अधिकाऱ्याची पदोन्नती रद्द करुन आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल.

VI. विभागाने निवडसूचीतील अधिकाऱ्यांची पदोन्नतीने नियुक्ती करताना "महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०२१" दि.१४.०७.२०२१ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात आली आहे.

VII. विभागाने आस्थापना मंडळास सादर केलेल्या ज्येष्ठतासूचीनुसार विचारक्षेत्रातील अधिकाऱ्यांची पात्र/अपात्रता तपासण्यात आली असून ज्येष्ठतासूचीबाबत कोणतेही प्रकरण भविष्यात उद्भवल्यास सामान्य प्रशासन विभागाशी विचारविनिमय करुन निर्णय घेण्यात येईल.

VIII. सदर निवडसूचीतील सेवाज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या, तथापि पदोन्नती नाकारलेल्या, अधिकाऱ्यांच्या पदोन्नती संदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१२.०९.२०१६ च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्यात येईल.

IX. सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्रमांक : ईएसबी-११२१/प्र.क्र.२२८/१३, दि.१२.११.२०२१ च्या पत्रातील अटी व शर्तीनुसार सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

**०२.** या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येणाऱ्या अधिकाऱ्यानी हे आदेश प्राप्त होताच पदोन्नतीने नियुक्तीच्या ठिकाणी विहित कालावधीत रुजू होणे आवश्यक आहे. पदोन्नत अधिकारी हे विहित कालावधीत रुजू न होता ते ज्या दिनांकास पदोन्नतीच्या ठिकाणी रुजू होतील, त्या दिनांकापासून पदोन्नत झाल्याचे समजण्यात येईल.

**०३.** या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्याना पदोन्नतीने नियुक्तीच्या ठिकाणी ज्या दिनांकास हजर होण्यास कळविण्यात आले आहे व ते नियुक्तीच्या ठिकाणी ज्या दिनांकास हजर होतील, याबाबत शासनास तातडीने अवगत करण्यात यावे. या आदेशान्वये पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्याचा पदस्थापना केलेल्या पदावर रुजू झाल्याचा अहवाल संबंधित कार्यालय / संचालक, नगर रचना, पुणे यांनी nitin.shelke@nic.in या ई-मेल पत्त्यावर तात्काळ सादर करावा.

**०४.** पदोन्नत अधिकारी हे पदोन्नतीने नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास किंवा पदोन्नती न स्वीकारल्यास, त्यांना पदोन्नती नको आहे, असे समजून त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच अशा अधिकाऱ्यास कालबद्ध पदोन्नती / सेवातंर्गत आश्वासित प्रगती योजना / सुधारित सेवातंर्गत आश्वासित प्रगती योजनेचा पहिला / दुसरा लाभ मंजूर करण्यात आला असल्यास, वित्त विभाग, शासन शुद्धीपत्रक क्र.आप्रयो-१०१५/प्र.क्र.१११/२०१५/सेवा-३, दि.२३ डिसेंबर, २०१५ मधील तरतुदीनुसार सदरचा लाभ काढून घेण्यात येईल. मात्र दिलेल्या लाभाची वसुली करण्यात येणार नाही.

**०५.** या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येणाऱ्या अधिकाऱ्यांनी पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१२.०९.२०१६ मधील तरतुदीनुसार त्यांचे नांव निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल. तसेच यानंतर पुढील दोन वर्षी होणाऱ्या निवडसूच्यांमध्ये संबंधित अधिकाऱ्यांची पदोन्नतीसाठीची पात्रता तपासण्यात येणार नाही. तद्नंतर गुणवत्तेप्रमाणे संबंधित अधिकारी पदोन्नतीसाठी पात्र ठरल्यास त्याचा नियमित निवडसूचीत समावेश करण्याबाबत त्यांच्या नांवाचा विचार करण्यात येईल.

**०६.** या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांनी पदग्रहण केल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत वेतननिश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प न दिल्यास महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम ११ (१) (ए) व महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००९ मधील नियम १३ (अ) (१) (२) (ब) (१ व २) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन त्यांची वेतननिश्चिती करण्यात यावी.

**०७.** या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांनी पदोन्नतीने नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास किंवा राजकीय दबाव आणून नियुक्ती अन्य ठिकाणी करण्याचा प्रयत्न केल्यास, संबंधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात त्यानुसार नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाची कृती ही महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम ३ (३) व २३ चा भंग करणारी असल्याने संबंधित अधिकाऱ्याविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, यांची नोंद घेण्यात यावी.

०८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक **२०२१११३०१३१८०१९६२५** असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, pseudonym=313EF6135E0B8753370AABCB2544201CB95641CD, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=Vijay Karbhari Chaudhari
Date: 2021.11.30 15:48:08 +05'30'

**( विजय चौधरी )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१.मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. अपर मुख्य सचिव (सेवा) यांचे स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. मा. प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. मा. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. विभागीय आयुक्त, पुणे
१०. जिल्हाधिकारी, पुणे/मुंबई.
११. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई/नागपूर.
१२. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. (३-प्रती)
१३. संचालक, नगर रचना तथा सह सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. संचालक, नगर रचना तथा मुख्य नियोजक, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
१५. सह संचालक, नगर रचना........(सर्व)
१६. सह सचिव, कार्यासन-१३, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागपूर.
१९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
२०. निवडनस्ती / नवि-२७.

*****